**तंत्र शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील उच्च शिक्षणाच्या शासकीय व अशासकीय अनुदानित संस्थांमध्ये प्रवेशासाठी केंद्र शासनाच्या The Rights of Persons with Disabilities Act, २०१६ च्या तरतूदीनुसार कार्यवाही करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र.२३१/तांशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २५ जून, २०१८

संदर्भ : १) The Rights of Persons with Disabilities Act, २०१६.
२) आयुक्त, अपंग कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.अकआ/प्र-७/मोफतशिक्षण/क-३१(२)/२०१७-१८/२८, दिनांक २०/६/२०१७.
३) संचालक तंत्र शिक्षण यांचे पत्र क्र. २-अ/एडीएम/२०१८/४७४, दिनांक १०/४/२०१८.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने The rights of persons with Disabilities Act, २०१६, दिनांक २८ डिसेंबर,२०१६ रोजी राजपत्रात प्रसिध्द केला आहे. या अधिनियमाच्या कलम ३२ मध्ये पुढीलप्रमाणे तरतूद आहे :-

१) All Government institutions of higher education and other higher education institutions receiving aid from the Government shall reserve not less than five per cent seats for persons with benchmark disabilities.
२) The person with benchmark disabilities shall be given an upper age relaxation of five years for admission in institutions of higher education.

केंद्र शासनाच्या या अधिनियमातील तरतूदीनुसार तंत्र शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील पदवी व पदव्युत्तर शिक्षण देणाऱ्या विविध शासकीय व अशासकीय अनुदानित संस्थांमध्ये लक्षणीय अपंगत्व असणाऱ्या व्यक्ती/ विद्यार्थ्यांकरीता ५ टक्के इतक्या जागा राखीव ठेवणे आवश्यक आहे.

**शासन निर्णय :-**

The Rights of Persons with Disabilities Act, २०१६ च्या कलम ३२ (१) मधील तरतूदीनुसार तंत्र शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील पदवी व पदव्युत्तर शिक्षण देणाऱ्या विविध शासकीय व अशासकीय अनुदानित संस्थांमध्ये लक्षणीय अपंगत्व

असणाऱ्या व्यक्ती/ विद्यार्थ्यांकरीता ५ टक्के इतक्या जागा राखीव ठेवण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. या निर्णयाची अंमलबजावणी शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून करण्यात यावी. यासाठी विविध अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमामध्ये आवश्यक ती सुधारणा करण्यात यावी.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०६२५१८०५५६०४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay A. Dharurkar

Digitally signed by Sanjay A. Dharurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, cn=Sanjay A. Dharurkar
Date: 2018.06.26 15:46:54 +05'30'

**( संजय औ.धारुरकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा तथा सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, ८ वा मजला, न्यु एक्सलसिअर इमारत, ए.के.नायक मार्ग, फोर्ट, मुंबई - ४०० ००१
२. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. आयुक्त, अपंग कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. सर्व सहसंचालक, तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय.
५. कुलसचिव, सर्व अकृषी सार्वजनिक विद्यापीठे.
६. सर्व संबंधित संस्था (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत).
७. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती/तांशि-४.